**श्री.ज.ल.पावरा, उप सचिव यांना उप सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः उसप १३१२/प्र.क्र.१२२/१२/का.१४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १९ डिसेंबर, २०१६

संदर्भ :- सा.प्र.वि. आदेश क्र.उसप १३१०/प्र.क्र.७२/१०/का.१४, दि.२७.०१.२०१४

**आदेश**

अवर सचिव पदावरुन उप सचिव पदावर पदोन्नतीसाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१०-२०११ च्या निवडसूचीवर अ.ज. प्रवर्गासाठी १ पद उपलब्ध झाले होते. सदर एका पदासाठी ज्येष्ठतेने श्री.सो.ना.बागुल हे अधिकारी पदोन्नतीसाठी पात्र ठरले. तथापि, श्री.सो.ना.बागुल यांना अ.ज. प्रवर्गात ज्येष्ठ असलेले श्री.ज.ल.पावरा यांची अवर सचिव पदावरील पदोन्नती नियमित नसल्याने, श्री.पावरा यांचा सन २०१०-२०११ च्या निवडसूचीमध्ये उप सचिव पदावरील पदोन्नतीसाठी विचार करण्यात आला नाही.

२. तदनंतर श्री.पावरा यांची अवर सचिव पदावरील पदोन्नती नियमित करण्यात आल्यामुळे तसेच आदिवासी विकास विभागांतर्गत सुरु असलेल्या विभागीय चौकशीतून दि.१७.०५.२०१० च्या आदेशान्वये दोषमुक्त करण्यात आल्यामुळे, त्यांचा उप सचिव पदावरील पदोन्नतीसाठी सन २०१०-२०११ च्या निवडसूचीवर विचार करुन त्यांना पात्र ठरविण्यात आले. तथापि, श्री.ज.ल.पावरा यांच्याविरुध्द आदिवासी विकास विभागांतर्गत सीटी टॉवर गृहनिर्माण संस्थेतील गैरव्यवहार प्रकरणी प्रलंबित असलेल्या फौजदारी खटल्यातून निर्दोष मुक्तता झाल्यानंतर त्यांचा उप सचिव पदावर पदोन्नतीसाठी विचार करण्यात यावा, असा जाणीपूर्वक निर्णय शासन मान्यतेने घेण्यात आला. सदर फौजदारी खटल्यातून न्यायालयाने त्यांच्या दि.२८.०५.२०१३ च्या न्यायनिर्णयान्वये श्री.पावरा यांना निर्दोष ठरविले आहे. या निर्णयाविरुध्द सत्र न्यायालय, ठाणे येथे क्रीमीनल अपील क्र.३३७/२०१३ दाखल करण्यात आले. फौजदारी खटल्यातील निर्णयाविरुध्द सत्र न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या अपीलावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून, श्री.पावरा यांना संदर्भाधीन आदेशान्वये उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली.

३. सिटी टॉवर प्रकरणातील सर्वश्री भा.र.गावीत व अन्य अधिकारी यांनी उप/ अवरसचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक व त्याअनुषंगाने लाभ मिळण्यासाठी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणात दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.२९६/२०१५ वर झालेल्या दि.०९.०२.२०१६ रोजी झालेल्या सुनावणीमध्ये मा.न्यायाधिकरणाने त्यांना उप/ अवर सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव देण्यासंदर्भात सहा आठवडयात निर्णय घेण्याचे निदेश दिले. त्यास अनुसरुन श्री.भा.र.गावीत व श्री.प्र.ग.देशमुख या अधिकाऱ्यांना दि.१७.०३.२०१६ च्या आदेशान्वये उप सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्यात आला आहे.

४. आता, श्री.ज.ल.पावरा यांना सन २०१०-२०११ च्या निवडसूचीमधून उप सचिव पदावरील पदोन्नतीसाठी आस्थापना मंडळाने पात्र ठरविले असल्याने, त्यांना १८.०५.२०११ हा दिनांक उप सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्यात येत आहे. श्री.ज.ल.पावरा हे सन २०१०-२०११ च्या

निवडसूचीमध्ये पात्र ठरले असल्यामुळे, सदर निवडसूचीमधील सेवा कनिष्ठ अधिकारी श्री.वि.द.आठवले यांचे नाव वगळण्यात येत असून, त्यांचा समावेश पुढील निवडसूचीमध्ये करण्यात येईल.

५. सदर उप सचिव पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून तसेच याचिका क्र. २९८२/२०००, २९८६/२००० व ४९५८/२००३ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे. सदर मानीव दिनांक महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

६. श्री.ज.ल.पावरा यांचा उप सचिव पदावरील मानीव दिनांक हा सेवाज्येष्ठता व वेतननिश्चितीसाठी ग्राहय धरण्यात यावा. तसेच श्री.पावरा यांचा उप सचिव पदावरील मानीव दिनांक १८.०५.२०११ पासून काल्पनिक वेतननिश्चिती करुन, त्याचा प्रत्यक्ष लाभ त्यांना उप सचिव पदावरील प्रत्यक्ष पदोन्नतीच्या दिनांकापासून अनुज्ञेय राहील.

७. सदरहू शासन आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४३२/२०१६/का.१२, दि.२९.०९.२०१६ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५७८/१६/सेवा-३, दि.२८.१०.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१६१२१९१२२०३८३३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2016.12.19 12:23:53 +05'30'

**( इ.मु.काझी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) प्र.स (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
४) सह/उप सचिव (आस्थापना) - गृह विभाग
५) संबंधित अधिकारी , विभागामार्फत
६) निवड नस्ती कार्या.१४.